**गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि. २२.०८.२०२२ खंडीत कालावधीतील पहिल्या टप्प्यात प्राप्त झालेले दावे निकाली काढण्यासाठी रु. २९.९५ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १० मार्च, २०२३.

संदर्भ :- १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.३१.०८.२०१९.
२) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र. १९३/ ११-अे, दि.१९.९.२०१९.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र.३२/११-अे, दि.८.३.२०२१.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र.३२/११-अे,दि.२४.३.२०२१.
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे,दि.२८.११.२०२२.
६) संचालक(वि.प्र.),कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०२२/प्र.क्र.१३१/का.सां-९/ ७३२५/२०२२,दि.२८.०२.२०२३.

प्रस्तावना :-

सन २०२१-२२ या वर्षामध्ये गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना चालू ठेवण्यासाठी संदर्भाधिन क्र. (३) येथील दि. ८.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व संदर्भाधिन क्र. (४) येथील दि. २४.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना दि.७.०४.२०२२ पासून लागू करणे आवश्यक होते. तथापि, प्रशासकीय कारणास्तव प्रस्तुत योजना दि.०७.०४.२०२२ पासून लागू होवू शकली नाही. गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेअंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ या खंडीत कालावधीमध्ये प्राप्त झालेले प्रस्ताव निकाली काढण्यासाठी विशेष बाब म्हणून संदर्भ क्र. (५) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. यानुसार आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (६) अन्वये मागणी केल्यानुसार गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसाठी सन २०२२-२३ या वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात निधीमधून या योजने अंतर्गत दिनांक ०७.०४.२०२२ ते २२.०८.२०२२ या १३८ दिवसाच्या खंडीत कालावधीतील पहिल्या टप्प्यातील १५०८ (१४८२ मृत्यू + २६ अपंगत्व) पात्र विमा दावे निकाली काढण्यासाठी एकूण रु. २९.९५ कोटी इतकी रक्कम योजनेंअंतर्गत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसाठी सन २०२२-२३ या वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात निधीमधून या योजने अंतर्गत दिनांक ०७.०४.२०२२ ते २२.०८.२०२२ या १३८ दिवसाच्या खंडीत कालावधीतील पहिल्या टप्प्यातील १५०८ (१४८२ मृत्यू + २६ अपंगत्व ) पात्र विमा दावे निकाली काढण्यासाठी एकूण रु.२९.९५ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे .

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा-

**मागणी क्र. डी - ३**
**२४०१ पीक संवर्धन**
**(००) (०६) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम)**
**(२४०१ ४४२७) राज्य योजना - ३३ अर्थसहाय्य.**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) व (२) च्या शासन निर्णय/ परिपत्रकात नमूद तरतूदीनुसार तसेच योजनेच्या मार्गदर्शक सूचना आणि अटी व शर्तीनुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. सदरचा निधी हा आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या छाननी समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र. (६) येथील पत्रासोबत प्राप्त यादीतील पात्र शेतकऱ्यांच्या / वारसदाराच्या बँक खात्यात ECS व्दारे उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

६. प्रस्तुत प्रयोजनार्थ जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी तर संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२३०३१०१५४३४९३५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.03.10 15:49:14 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. सर्व मा. विधानमंडळ सदस्य
६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
७. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सह सचिव, (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. उप सचिव, (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१४. सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), मुंबई.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), नागपूर
१८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
१९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

२१. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२२. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
२३. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
२५. निवडनस्ती, कार्यासन ११-अे.